"स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" अंतर्गत महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमीच्या कार्यक्रम आयोजनाच्या खर्चास मान्यता मिळणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग मंत्रालय, मुंबई,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण ८२२३/प्र.क्र.४२५/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २६ मार्च, २०२४

**संदर्भ :-**१) पर्यटन व सांस्कृतिक विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२२/प्र.क्र.४२५/ सां.का.४, दि. ५ जुलै, २०२३.
२) सह संचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, साहित्य अकादमीचे यांचे पत्र क्र.मराहिंसाअ/४३७-४३८/२०२४, दि. २० मार्च, २०२४.

**प्रस्तावना :**

राज्यामध्ये हिंदी भाषा आणि साहित्याच्या विकासासाठी महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमी कार्यरत असून या अकादमीद्वारे राज्यात हिंदी भाषा आणि साहित्याचे संवर्धन आणि विकास या संबंधी विविध उपक्रम राबविण्यात येतात. उपर्निर्दिष्ट क्र.१ अन्वये हिंदी अकादमीच्या विविध कार्यक्रमांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. उपर्निर्दिष्ट क्र.२ अन्वये हिंदी अकादमीच्या संपन्न झालेल्या कार्यक्रम आयोजनाच्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमीच्या कार्यक्रम आयोजनाचा खर्च रुपये ६,६४,१४७/- ( अक्षरी रुपये सहा लक्ष चौषष्ठ हजार एकशे सत्तेचाळीस फक्त ) इतक्या रकमेच्या खर्चास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर कार्यक्रमाचा खर्च “स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवानिमित्त कार्यक्रमांचे आयोजन” मुख्य लेखाशीर्ष मागणी क्र. झेडडी- २ प्रधान लेखाशिर्ष २२०५, कला व संस्कृती (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव (१३) (०१) स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ ३७३३) ५० इतर खर्च या लेखा शीर्षाखालील सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून मंजूर करण्यात येत आहे.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना निधी वितरणासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, त्यांना सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांचे कार्यालयातील अधिकारी यांना नियंत्रण अधिकारी घोषित करण्याचे अधिकार प्रदान करण्यात येत आहे. संबंधित नियंत्रण अधिकारी यांनी प्राधिकृत केलेले अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांनी सदर प्रयोजनार्थाचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्या मार्फत शासनास सादर करावे. तसेच, वेळोवेळी प्रगती अहवाल संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्या मार्फत शासनास सादर करण्यात यावा.

०४. सदर खर्चास वित्तविभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/विनिमय, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ , उपविभाग ३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७(२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मान्यता देण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी सहसंचालक तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी साहित्य अकादमी, मुंबई यांची राहिल.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३२६१२१०२३४४२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIROODHA
SURYAKANT
DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2024.03.26 12:21:43 +05'30'

**( अनिरुध्द सु. देशपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्ययांचे खाजगी सचिव
२. प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य, यांचे स्वीय सहाय्यक
३. उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक (सां.का.), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय मुंबई
५. सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, ओल्ड कस्टम हाऊस, विकास विभाग इमारत, शहिद भगतसिंग मार्ग, मुंबई ४०० ००१.
६. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९. महा लेखापाल (लेखा परीक्षा) १ - महाराष्ट्र, मुंबई
१०. महा लेखापाल (लेखा परीक्षा) २ - महाराष्ट्र, नागपूर
११. महा लेखापाल (लेखा अनुज्ञेयता) १ - महाराष्ट्र, मुंबई
१२. महा लेखापाल (लेखा अनुज्ञेयता) २ - महाराष्ट्र, नागपूर
१३. निवड नस्ती (सां.का.४)